**महानगरपालिकांच्या मालमत्तेवरील, रस्त्यावरील बेकायदेशिरपणे सोडून दिलेली वाहने / बेवारस वाहनांबाबत तक्रार नोंदविण्यासाठी तक्रार निवारण यंत्रणा कार्यान्वित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : न्यायाप्र -२०१८/प्र.क्र.६७९ /नवि-२०**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- १४ सप्टेंबर, २०१८.

**प्रस्तावना:-**

मा. उच्च न्यायालय मुंबई जनहित याचिका क्र. ९२/२०१३ टेकचंद खणचंदाणी विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर प्रकरणी अनधिकृतपणे सोडून दिलेली वाहने (बेवारस वाहने ) याबाबत नागरीकांना तक्रारी नोंदविण्यासाठी तक्रार निवारण यंत्रणा गठीत करण्याबाबत मा. उच्च न्यायालयाने सूचना दिल्या आहेत. सदर तक्रार निवारण यंत्रणा जनहित याचिका क्र. १७३/२०१० प्रकरणी दिलेल्या आदेशानुसार असावी, असे निर्देशित केले आहे.

अनधिकृतपणे सोडून दिलेली वाहने तथा बेवारस वाहनामुळे रहदारीस अडथळा निर्माण होतो. तसेच स्वच्छता व सुरक्षिततेसंदर्भात प्रश्न निर्माण होण्याची शक्यता राहते. याबाबी विचारात घेता प्रस्तुत प्रकरणी सर्व महानगरपालिकांना मार्गदर्शक सूचना निर्गमित करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

अनधिकृतपणे सोडून दिलेली वाहने (बेवारस वाहने ) याबाबत नागरीकांना तक्रारी नोंदविण्यासाठी तक्रार निवारण यंत्रणा गठीत करण्याबाबत व तक्रारीबाबत कार्यवाही करण्यासाठी सर्व महानगरपालिकांना पुढील प्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

अ) महानगरपालिकांच्या मालमत्तेवरील, रस्त्यावरील बेकायदेशिरपणे सोडून दिलेली वाहने / बेवारस वाहनांची विल्हेवाट लावण्याकरीता स्थानिक परिस्थिती विचारात घेऊन व स्थानिक पोलीस प्रशासनाशी विचार विनिमय करुन कालबध्द कार्यवाहीकरीता धोरण निश्चित करून कार्यवाही करावी.

ब) रस्त्यावरील बेकायदेशिरपणे सोडून दिलेली वाहने / बेवारस वाहनांबाबत तक्रार नोंदविण्यासाठी महानगरपालिकांनी टोलफ्री दुरध्वनी क्र. उपलब्ध करावेत. तसेच Whatsapp लघुसंदेश, ई-मेल द्वारे तक्रारी नोंदविण्यासाठी सुविधा उपलब्ध करावी.

क) सदर तक्रारीसाठी स्वतंत्र तक्रार वही निश्चित करुन नागरीकांना त्यानुसार तक्रार क्रमांक उपलब्ध करुन द्यावा, जेणेकरुन तक्रारीचा मागोवा घेणे नागरीकांना व प्रशासनास शक्य होईल.

ड) प्राप्त तक्रारी बाबत स्थानिक पोलीस प्रशासनास अवगत करावे व महानगरपालिकांनी निश्चित केलेल्या धोरणानुसार कालबध्द स्वरुपात कार्यवाही करावी.

इ) निनावी तक्रारींचीही दखल घ्यावी.

ई) तक्रार निवारण यंत्रणेस कार्यालयीन सूचना फलक, वृत्तपत्रे, इलेक्ट्रॉनिक प्रसार माध्यमे, समाज माध्यमे (Social Media) इत्यादीद्वारे वेळोवेळी प्रसिध्दी द्यावी.

फ) प्राप्त तक्रारीबाबत आवश्यक कार्यवाही त्वरेने करावी आणि याबाबतचा नियतकालिक आढावा उपायुक्त दर्जापेक्षा कमी दर्जा नसलेल्या अधिकाऱ्यांमार्फत घेण्यात यावा.

उपरोक्त सूचनानुसार केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्राच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१८०९१५१७२६५३१३२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shankar Trambak Jadhav

Digitally signed by Shankar Trambak Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD and Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cccfd79237cd08ae181b91f021d984be73c43b02234d4c07b7da787cf666bc54, cn=Shankar Trambak Jadhav
Date: 2018.09.15 17:32:12 +05'30'

**(शंकर जाधव)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) मा.विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
२) सर्व सन्मानीय विधानसभा / विधानपरिषद व संसद सदस्य
३) मा.राज्यपाल महोदय यांचे सचिव
४) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
५) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मा.राज्य निवडणूक आयोग यांचे कार्यालय
७) मा.मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
८) मा.लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय
९) मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी
१०) राज्यातील सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
११) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
१२) उप सचिव (गृह विभाग), मंत्रालय, मुंबई.
१३) कक्ष अधिकारी (नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदरचे परिपत्रक विभागाच्या नागरीकांची सनदवर प्रसिध्द करण्यात यावे.
१४) नगर विकास विभाग (नवि-२) सर्व कार्यासने
१५) निवडनस्ती (नवि-२०)